2011090712144600।

महाराष्ट्र शासन

क्रमांकः-एमएमसी २०११/८०/प्र.क्र.३६/२०११/नवि-३२(२)
नगर विकास विभाग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांकः- १२ जुलै, २०११

प्रति,
(१) सर्व महानगरपालिकांचे महापौर,
(२) प्रधान सचिव, राज्य निवडणूक आयोग,नवीन प्रशासन भवन,मुंबई
(३) आयुक्त तथा संचालक नगर परिषद प्रश[illegible] संचालनालय,वरळी,मुंबई,
(४) सर्व विभागीय आयुक्त तथा प्रादेशिक संचालक नगरपरिषद प्रशासन संचालनालय
(५) सर्व जिल्हाधिकारी,
(६) सर्व नगर परिषदा / नगर पंचायती यांचे मुख्याधिकारी,
(७) प्रबंधक,मुंबई उच्च न्यायालयाची सर्व खंडपीठे,(यादीप्रमाणे),
(८) प्रबंधक, सर्व जिल्हा न्यायालये व राज्यातील इतर न्यायालये(यादीप्रमाणे)
(९)महासंचालक,माहिती व जनसंपर्क संचालनालय,मंत्रालय,मुंबई.
(१०) संचालक, अखिल भारतीय स्थानिक स्वराज्य संस्था,एम.एन.रॉय कॅम्पस,टी.पी.एस.रोड, वांद्रे (पूर्व ),मुंबई-४०० ०५१.

विषयः- महाराष्ट्र नगरपरिषदा,नगरपंचायती (अध्यक्ष पदाची निवडणूक) (सुधारणा) नियम,२०११

महोदय ,

नगरपरिषदा व नगरपंचायतींमधील महिलांसाठी अध्यक्ष पदांचे आरक्षण ५०% करण्याकरीता महाराष्ट्र नगरपरिषदा,नगरपंचायती (अध्यक्ष पदाची निवडणूक) (सुधारणा) नियम,२०११, दिनांक ७ जून,२०११ रोजी शासन राजपत्रात प्रसिध्द करण्यात आले आहेत. प्रस्तुत नियमाची प्रत आपल्या माहितीसाठी व आवश्यक कार्यवाहीसाठी सोबत पाठविण्यात येत आहे.

आपला,

( आ.श्रा.जिंदने )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत सादर अग्रेषित (नियमाच्या इंग्रजी व मराठी प्रतीसह)
(१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,

(२) मा.राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव,

(३) प्रधान सचिव(नवि-१) (नगर विकास विभाग),मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक,

(४) प्रधान सचिव (नवि-२)(नगर विकास विभाग),मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक,

(५) नगर विकास विभागातील सहसचिव/ उपसचिव/ अवर सचिव/ कक्ष अधिकारी,

(६) वेब कोऑर्डिनेटर(नवि-२९),नगर विकास विभाग,मंत्रालय,मुंबई-३२,

(७) निवडनस्ती (नवि-३२).

-----

RNI No. MAHBIL/2009/31748
Reg. No. MH/MR/South-324/2010-12




# महाराष्ट्र शासन राजपत्र
# असाधारण भाग एक-अ—मध्य उप-विभाग

वर्ष ३, अंक १७(२)] मंगळवार, जून ७, २०११/ज्येष्ठ १७, शके १९३३ [पृष्ठे २, किंमत : रुपये २०.००

## असाधारण क्रमांक ५७

## प्राधिकृत प्रकाशन

**महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समित्या, ग्रामपंचायती, नगरपरिषदा, प्राथमिक शिक्षण आणि स्थानिक निधी लेखापरीक्षा अधिनियम यांखालील (भाग चार-ब मध्ये प्रसिद्ध करण्यात आलेले आदेश व अधिसूचना यांव्यतिरिक्त) आदेश व अधिसूचना.**

**नगरविकास विभाग**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक ७ जून २०११

**अधिसूचना**

**महाराष्ट्र नगरपरिषदा, नगरपंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५.**

क्रमांक एमएमसी. २०११/८०/प्र.क्र. ३६/नवि-३२(२).— ज्याअर्थी, महाराष्ट्र नगरपरिषदा, नगरपंचायती (अध्यक्ष पदाची निवडणूक) नियम, १९८१ यामध्ये आणखी सुधारणा करणे इष्ट वाटते ;

आणि ज्याअर्थी, उपरोक्त प्रयोजनांकरिता नियम करण्यासाठी तात्काळ कार्यवाही करणे आणि त्या प्रयोजनार्थ त्या नियमांच्या पूर्व प्रसिद्धीची शर्थ काढून टाकणे जीमुळे आवश्यक वाटते अशी परिस्थिती अस्तित्वात असल्याबाबत महाराष्ट्र शासनाची खात्री पटली आहे ;

त्याअर्थी, आता महाराष्ट्र नगरपरिषदा, नगरपंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५ (१९६५ चा महा. ४०) च्या कलम ५१-१अ आणि कलम १७ चे पोट-कलम (२) च्या खंड (क्यू) यासह कलम ३२१ याद्वारे प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा व त्याबाबतीत महाराष्ट्र शासनास समर्थ करणाऱ्या इतर सर्व अधिकारांचा वापर करून, महाराष्ट्र नगरपरिषदा, नगरपंचायती (अध्यक्ष पदाची निवडणूक) नियम, १९८१ मध्ये सुधारणा करण्यासाठी राज्य निवडणूक आयुक्त यांचेशी सल्लामसलत करून महाराष्ट्र शासन याद्वारे पुढील नियम करीत आहे, ते असे :—

१. या नियमांना महाराष्ट्र नगरपरिषदा, नगरपंचायती (अध्यक्ष पदाची निवडणूक) (सुधारणा) नियम, २०११ असे म्हणावे.

२. महाराष्ट्र नगरपरिषदा, नगरपंचायती (अध्यक्ष पदाची निवडणूक) नियम, १९८१ च्या नियम २अ च्या खंड (क) मधील,—

(१) उप-खंड (तीन) मध्ये, " एक तृतीयांश " या मजकुराऐवजी " एक द्वितीयांश " हा मजकूर दाखल करण्यात येईल.

(२) उप-खंड (चार) मध्ये ज्या दोन ठिकाणी, " एक तृतीयांश " असा मजकूर आला असेल त्या मजकुराऐवजी " एक द्वितीयांश " हा मजकूर दाखल करण्यात येईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**आ. श्रा. जिवने,**
शासनाचे उप सचिव.

## URBAN DEVELOPMENT DEPARTMENT

Mantralaya, Mumbai 400 032, dated the 7th June 2011

*NOTIFICATION*

MAHARASHTRA MUNICIPAL COUNCILS, NAGAR PANCHAYATS AND INDUSTRIAL TOWNSHIPS ACT, 1965.

No. MMC-2011/80/CR-36/UD-32(2).—Whereas, it is expedient further to amend the Maharashtra Municipal Councils and Nagar Panchayats (President Election) Rules, 1981 ;

And whereas, the Government of Maharashtra is satisfied that circumstances exist which render it necessary to take immediated action ; and for that purpose, to dispense with the condition of provious publication thereof.

Now, therefore, in exercise of the powers conferred by section 51-1A and clause (*q*) of sub-section (*2*) of section 17 read with section 321 of the Maharashtra Municipal Councils, Nagar Panchayats and Industrial Townships Act, 1965 (Mah. XL of 1965) ; and of all other powers enabling it in that behalf, the Government of Maharashtra, after consultation with the State Election Commissioner, hereby makes the following rules further to amend the Maharashtra Municipal Councils and Nagar Panchayats (President Election) Rules, 1981, as follows, namely :—

1. These rules may be called the Maharashtra Municipal Councils and Nagar Panchayats (President Election) (Amendment) Rules, 2011.

2. In Rule 2A of the Maharashtra Municipal Councils and Nagar Panchayats (President Election) Rules, 1981, in clause (*a*),—

(*1*) in sub-clause (*iii*), for the words " one-third ", the words " one-half " shall be substituted ;

(*2*) in sub-clause (*iv*), for the words " one-third ", at both the places where they occur, the words " one-half " shall be substituted.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

A. S. JIWANE,

Deputy Secretary to Government.

ON BEHALF OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATION, PRINTED AND PUBLISHED BY SHRI PARSHURAM JAGANNATH GOSAVI, PRINTED AT GOVERNMENT CENTRAL PRESS, 21-A, NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004 AND PUBLISHED AT DIRECTORATE OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATION, 21-A, NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004, EDITOR : SHRI PARSHURAM JAGANNATH GOSAVI.